**जिल्हा व तालुका पेसा समन्वयकांच्या मानधनाकरीता निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.आविवि-२०१७/प्र.क्र.१३२/का-१७.**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ६ मे, २०१७.

वाचा: ग्रा.वि.वि.ची नस्ती क्र.पेसाअ-२०१६/प्र.क्र.८०/पंरा-२.

**शासन निर्णय:**

राज्यात जिल्हा व तालुका पेसा समन्वयकांची नियुक्ती राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियानांतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात आली आहे. परंतु केंद्र शासनाकडून प्राप्त होणारा निधी विहीत मुदतीत प्राप्त होत नसल्याने ग्राम विकास विभागाकडून जिल्हा व तालुका समन्वयकांना वारंवार दर तीन महिन्यांनी मुदतवाढ दिली जाते. पेसा कायदयाची व ५% अबंध निधी योजनेची अमंलबजावणी याबाबत क्षेत्रीय स्तरावर जिल्हा व तालुका पेसा समन्वयक करीत असलेले काम विस्कळीत होऊ नये म्हणून जिल्हा पेसा समन्वयकांच्या मानधनाकरीता दरमहा रु.२५,०००/-व तालुका पेसा समन्वयकांच्या मानधनाकरीता दरमहा रु.२०,०००/-याप्रमाणे १३ जिल्हा पेसा समन्वयक व ५९ तालुका पेसा समन्वयक यांच्या एप्रिल-२०१७ ते सप्टेंबर-२०१७ या सहा महिन्यांच्या कालावधीच्या मानधनाकरीता एकूण रु.९०,३०,०००/-(रुपये नव्वद लाख तीस हजार फक्त) या विभागाकडून उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी सदरचा निधी आहरित करुन राज्य प्रकल्प संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष (RGPSA), पुणे यांना वितरीत करावा. तसेच केंद्र शासनाकडून निधी प्राप्त झाल्यानंतर सदरच्या रु.९०,३०,०००/-इतक्या रक्कमेची ग्राम विकास विभागाने तातडीने राज्य शासनाकडे भरपाई करावी.

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.टी-५, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण (०१)(५३)आदिवासी कक्षामार्फत राज्यातील अनुसूचित क्षेत्रामध्ये पथदर्शी क्षेत्रामध्ये प्रकल्पाची अमंलबजावणी (२२२५ डी ३६९) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ मध्ये उपलब्ध असलेल्या निधीतून करण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र २०१७०५०६१३०६२०८१२४ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gajanan Ramdas Deshmukh

Digitally signed by Gajanan Ramdas Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9adf2fe1f77176611c6dae66e0049cd0f51f36579d7c577ba3ed2c944d27d926, cn=Gajanan Ramdas Deshmukh
Date: 2017.05.06 13:08:14 +05'30'

**(गजानन रा.देशमुख)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल महोदयांचे सचिव,
२. सचिव(ग्राम विकास व पंचायत राज), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, मुंबई-०१.,
३. आयुक्त, आदिवासी विकास , महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. राज्य प्रकल्प संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष (RGPSA), पुणे,
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
७. सर्व उपसचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.,
८. अवर सचिव/कक्ष अधिकारी (का-६/का-८), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (का-१७)